**प्रशासकीय मान्यता-**

**गंगापूर, जिल्हा औरंगाबाद येथे मा. जिल्हा न्यायाधीश तथा अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता १ व दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर यांचेकरिता १ अशी एकूण २ निवासस्थाने बांधणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२२२/प्र.क्र.६४/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ६ मे, २०२२.

**पहा :-** मा.प्रबंधक (निरिक्षणे-२), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)६०६८/२०१०(३३)/१६९५/९४३९, दिनांक १६ मार्च, २०२२ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

गंगापूर, जिल्हा औरंगाबाद येथे मा. जिल्हा न्यायाधीश तथा अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता १ व दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर यांचेकरिता १ अशा एकूण २ निवासस्थानांचे बांधकाम करण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून संदर्भाधीन पत्रान्वये शासनास सादर करण्यात आला आहे. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गंगापूर, जिल्हा औरंगाबाद येथे मा. जिल्हा न्यायाधीश तथा अतिरिक्त सत्र न्यायाधीश यांचेकरिता १ व दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर यांचेकरिता १ अशा एकूण २ निवासस्थानांचे बांधकाम करण्याकरीता रु.२,१०,९३,७१६/- (रुपये दोन कोटी दहा लक्ष त्र्याण्णव हजार सातशे सोळा फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशील | प्रशासकीय मान्यता रक्कम रुपयात |
|---|---|---|
| १. | इमारतीच्या बांधकामाचा खर्च | ९९,५९,८२०/- |
| २. | रेन वॉटर हारर्वेस्टींग | १,००,०००/- |
| ३. | अपंगांसाठी रॅम्प | १,००,०००/- |
| ४. | फर्निचर | १३,४०,७५०/- |
| ५. | पाणी पुरवठा आणि मलनि:स्सारण | ४,९७,९९१/- |
| ६. | अंतर्गत विद्युतिकरण ५% | ४,९७,९९१/- |
| ७. | बाह्य विद्युतीकरण ६% | ५,९७,५८९/- |

| | | |
|---|---|---|
| ८. | अग्नीशमन यंत्रणा | २,००,०००/- |
| ९. | संरक्षक भिंत आणि गेट | १६,००,०००/- |
| १०. | अंतर्गत रस्ते | १०,००,०००/- |
| ११. | जमीन सुशोभीकरण | २,००,०००/- |
| १२. | वाहनतळ | २,००,०००/- |
| १३. | भूसपाटीकरण | २,००,०००/- |
| १४. | जमीनीखालील पाण्याची टाकी | २,००,०००/- |
| १५. | जूनी इमारत पाडकाम | २,००,०००/- |
| १६. | आकस्मिकता निधी ४ % | ३,९८,३९३/- |
| १७. | वस्तू व सेवा कर १२ % | २०,२७,२९७/- |
| १८. | कामगार विमा ०.५० % | ८४,४७१/- |
| १९. | भाववाढ १० % | १६,८९,४१४/- |
| | **एकूण** | **२,१०,९३,७१६/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुदा अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना मा. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, औरंगाबाद यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

५) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी-२०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

८) सदर कामाकरिता सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, या दृष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

९) अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

११) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पध्दतीने सदर कामांना मंजूरी घेण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यांवर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च ०१- शासकीय निवासी इमारती -७००-इतर गृहनिर्माण -(०१) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), (०१) (०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) ५३ मोठी बांधकामे (४२१६ ०२९१) व (०३) न्यायदान (केंद्र पुरस्कृत योजना - केद्र हिस्सा), (०३)(०४) मोठी बांधकामे (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४२१६ ०५२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/ प्र.क्र.१०/ इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार तसेच, सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.६३/२०२२/ईमा-२, दिनांक ५ एप्रिल, २०२२ अन्वये आणि तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/ प्र.क्र.४८/ (भाग-१)/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०५०६१५१९१६८११२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.05.06 15:20:28 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**

**विधि सल्लागार नि सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.

२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.विरोधीपक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
५) मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
६) मा.प्रबंधक, बी(डब्ल्यू)शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई.
७) मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, औरंगाबाद.
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा) महाराष्ट्र-एक/दोन, मुंबई व नागपूर,
९) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
१०) कार्यकारी अभियंता (सार्वजनिक बांधकाम विभाग), औरंगाबाद (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग(२-इमा) , मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) कक्ष अधिकारी, वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०००३२,
१४) कक्ष अधिकारी, नियोजन विभाग-१४४३, मंत्रालय, मुंबई-४००००३२,
१५) अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ,-१८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन ,मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१७) कक्ष अधिकारी, का- ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१८) निवडनस्ती/संग्रहार्थ (कार्यासन-१३).